धरणातील गाळ काढण्यासाठी कार्यक्रम तयार करणेसाठी समिती गठीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

## शासन निर्णय क्रमांकः मेरीना २०१७/प्र.क्र.(१३/२०१७)/लाक्षेवि (आस्था)

मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: ३१.०३.२०१७

**प्रस्तावना**

राज्यात जलसंपदा व जलसंधारण विभागामार्फत अनेक पाटबंधारे प्रकल्प पुर्ण झाले आहेत. हे प्रकल्प पूर्ण होऊन सुमारे २० ते २५ वर्ष झाली आहेत. या कालावधीत धरणाच्या जलाशयात पाणलोट क्षेत्रातून गाळ आला आहे. त्यामुळे प्रकल्पाच्या पाणी साठवण क्षमतेत घट झाली आहे. महाराष्टात लातूर, उस्मानाबाद, बीड व इतर जिल्हयात लोकसहभागातून गाळ काढण्यात आला होता. या गाळाचा उपयोग शेतामध्ये टाकून जमीनीची सुपीकता वाढविण्यात यश आले होते.

महाराष्ट्रातील सर्वच प्रकल्पातून गाळ काढण्यासाठी कालबध्द कार्यक्रम करुन त्यांची अमंलबजावणी करण्याचे मा. मुख्यमंत्री यांचे निर्देश आहेत. त्याअनुषंगांने हा कार्यक्रम तयार करणसाठी तज्ञ समिती गठीत करण्याचे विचाराधीन होते. त्यानुसार शासन पुढील प्रमाणे समिती गठीत करण्याचा निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय-

(१) राज्यातील पाटबंधारे प्रकल्पातील गाळ काढण्याचा कालबध्द कार्यक्रम तयार करणेसाठी पुढील प्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव व पद | समितीतील पदनाम |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय | अध्यक्ष |
| २ | श्री. अमित चंद्रा, अकार्यकारी संचालक,टाटा सन्स. | तज्ञ सदस्य |
| ३ | श्री. निमेश सुमाती शहा, प्रतिनिधी,केअरींग फ्रेंडस | तज्ञ सदस्य |
| ४ | श्री. विवेक सावंत, व्यवस्थापकीय संचालक, MKCL | तज्ञ सदस्य |
| ५ | श्री. अनिकेत लोहिया, सचिव मानवलोक. | तज्ञ सदस्य |
| ६ | डॉ.आनंद बंग, मा.मुख्यमंत्री यांचे सल्लागार. | सदस्य |
| ७ | सचिव, (जलसंधारण),मंत्रालय,मुंबई. | सदस्य |
| ८ | सचिव, (लाक्षेवि) जलसंपदा विभाग, मंत्रालय, | सदस्य |
| ९ | सचिव (प्रकल्प समन्वय) जलसंपदा विभाग, मंत्रालय, | सदस्य |
| १० | उपसचिव, (लाक्षेवि) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य सचिव |

समिती अध्यक्षांच्या सहमतीने आवश्यकतेनुसार या विषयाशी संबंधित तज्ञ अधिकारी, स्वयंसेवी संस्थेचा निमंत्रित सदस्य म्हणून समावेश करता येईल.

**समितीची कार्यकक्षा-**

२.१) महाराष्ट्र राज्यात पाटबंधारे प्रकल्पातील गाळ काढण्यासाठी दिर्घ कालावधीसाठी योजना तयार करणेसाठी खालील बाबींचा समावेश असावा.

अ) महाराष्ट्रातील सर्व धरणातील गाळाचा सविस्तर अभ्यास, गाळ काढण्यासाठी आतापर्यंत झालेले प्रयत्न व त्याची परिस्थितीनुरुप विश्लेषण.

ब) भारतातील इतर राज्यात शासन,लाभधारक,स्वयंसेवी संस्था यांच्या माध्यमातून व आर्थिक स्त्रोतांचा किफायतशीर वापर करून राबविण्यात आलेल्या योजनांचा अभ्यास.

क) गाळ काढण्यासाठी पाटबंधारे प्रकल्पाची निवड.

इ) गाळ काढण्यासाठी कामाची कालमर्यादा ठरवणे.

ई) प्रत्यक्ष अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक तत्वे.

२.२) सदर योजना राबविण्यासाठी अंदाजीत रक्कम निश्चित करणे.

२.३) योजना राबविण्यासाठी नावीन्यपूर्ण आर्थिक स्त्रोताचे पर्याय.

२.४) सर्व लाभधारकांच्या सहभागातून व शासनाच्या पाठबळातून कार्यक्रम अंमलबजावणीसाठी मॉडेल विकसित करणे.

२.५) कार्यक्रमाच्या संनियंत्रणासाठी मुख्य लाभधारकाच्या सहभागाने नियतकालिक आढावा,मुख्य निर्देशांक (key indicator) व संनियंत्रण प्रणाली ठरवणे.

२.६) लाभधारकाची (समुदयाची) कार्य व जबाबदारी निश्चित करणे.उदा. पाणी वापर संस्थेची संरचना समजून व त्यांच्या सहभागाची शक्यता तपासणे तसेच स्थानिक स्वराज्य संस्थेसमवेत धरणाची देखभाल करणे.

२.७) महाराष्ट्र राज्य ग्रामीण रोजगार हमी योजना व धरणाची दुरूस्ती, नुतनीकरण व पुर्न:स्थापना (RRR) या सारख्या चालू असलेल्या योजनातून काम करणेसाठी आवश्यक सुचना करणे.

**(३) समितीचा कालावधी: -**

धरणातील गाळ काढण्यासाठी विकास कार्यक्रम तयार करण्यासाठी समिती स्थापन झाल्यापासून एक महिन्यात किंवा त्यापूर्वी समितीने अहवाल शासनास सादर करावा.

(४) समितीच्या कामकाजासाठी उपस्थित राहण्याकरिता समिती अध्यक्ष व सदस्यांना प्रत्यक्षात केलेला प्रवास व दैनिक भत्ता शासन निर्णय वित्त विभाग दि.१३.०३.२०१२ च्या शासन निर्णयातील तरतूदीप्रमाणे अनुज्ञेय असेल.

५) यासाठी होणारा खर्च कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे, यांच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३११५३०३७५५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Samadhan Kondiba Sabbinwar

Digitally signed by Samadhan Kondiba Sabbinwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=edf71af71cb5af716c886ed5f4a35b4cd501c5c14d689eea55123c51d80e8067, cn=Samadhan Kondiba Sabbinwar
Date: 2017.03.31 15:33:53 +05'30'

**( स. को. सब्बीनवार )**
शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (जलसंपदा) , जलसंपदा विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. सचिव (जलसंधारण) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. सचिव (लाक्षेवि) जलसंपदा विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
६. सचिव (प्रकल्प समन्वय) जलसंपदा विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
७. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई
८. महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान,संशोधन व सुरक्षितता, नाशिक
९. महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था, (वाल्मी), औरंगाबाद
१०.सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
११.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, औरंगाबाद
१२.श्री. अमित चंद्रा, अकार्यकारी संचालक,टाटा सन्स.
१३.श्री. निमेश सुमाती शहा प्रतिनिधी,केअरींग फ्रेंडस
१४.श्री. विवेक सावंत, व्यवस्थापकीय संचालक, MKCL
१५.श्री. अनिकेत लोहिया, सचिव मानवलोक.
१६.डॉ.आनंद बंग, मा.मुख्यमंत्री यांचे सल्लागार.
१७.मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक
१८. मुख्य अभियंता, विदर्भ संघन सिंचन विकास कार्यक्रम, नागपूर
१९.मुख्य अभियंता, लघु सिंचन (जलसंधारण) मंडळ, पुणे.
२०.सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२१.निवड नस्ती.